**धर्मादाय आयुक्त विभागाच्या संगणक प्रणालीतील अडचणी व वार्षिक सेवा व देखभाल-दुरूस्ती संदर्भातील प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या (PIC) बैठकीतील निर्णयाबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## विधि व न्याय विभाग

**शासन निर्णय क्रमांक : सीएचसी १११९/२९३/(१३२/१९)/कार्या-१७.**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २६ नोव्हेंबर, २०१९.

वाचा:-(१) शासनपत्र क्र. सीएचसी १११९/२९३/(१३२/१९)/कार्या-१७, दि.१६.०९.२०१९.
(२) धर्मादाय आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र. सीआएमपी/५३४३/२०१९, दि.१३.११.२०१९ .

**प्रस्तावना :**

धर्मादाय संघटनेतील संगणक प्रणाली विकसित करणे करिता धर्मादाय संघटनेने आर.एफ.पी. प्रसिद्ध केलेली होती. त्यातील अटी व शर्तीनुसार निविदा प्रक्रिया पार पाडून मे. मास्टेक ली. यांना संगणक प्रणाली विकसित करणेबाबत कंत्राट देण्यात आले होते. संगणक प्रणालीतील त्रुटी/दोष यांचे निराकारण कंपनीने केले नसल्याने, सदर प्रकरणी धर्मादाय आयुक्त कार्यालयाकडून प्रकल्प अंमलबजावणी समिती ( PIC ) मार्फत निर्णय घेण्याची विनंती करण्यात आली होती. मे. मास्टेक कंपनी सोबतचा करार नोव्हेंबर २०१९ च्या सुरवातीस संपत आहे, ही बाब विचारात घेता नवीन consultant नेमणे आवश्यक आहे, सदर प्रस्ताव व संबंधित प्रस्तावांबाबत PIC मध्ये निर्णय होणे आवश्यक असल्याने, सदर प्रकरणी प्रधान सचिव व विधि परामर्शी यांच्या अध्यक्षतेखाली प्रकल्प अंमलबजावणी समितीची ( PIC ) बैठक दि. १८.०९.२०१९ रोजी घेण्यात आली. सदर बैठकीत चर्चेअंती घेण्यात आलेल्या निर्णयाची अंमलबजावणी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

मे. मास्टेक कंपनी सोबतचा करार नोव्हेंबर २०१९ च्या सुरुवातीस संपत आहे, ही बाब विचारात घेता नवीन consultant नेमणे आवश्यक आहे व इतर संबंधित प्रस्तावांबाबत PIC मध्ये निर्णय होणे आवश्यक असल्याने, सदर प्रकरणी प्रधान सचिव व विधि परामर्शी यांच्या अध्यक्षतेखाली प्रकल्प अंमलबजावणी समिती ( PIC ) ची बैठक दि. १८.०९.२०१९ रोजी घेण्यात आली. सदर बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने खालील बाबींना शासन मान्यता देण्यात येत आहे. :-

१) मे. मास्टेक लि.यांनी RFP च्या अनुषंगाने असलेल्या सर्व संबंधित तृटी/ दोष यांचे निराकरण व अनुषंगिक डेव्हलपमेंट विनाअट , विना खर्च करावे. त्यानंतर मे. मास्टेक यांचे उर्वरीत देय रक्कम कराराच्या अटीप्रमाणे अदा करण्यात यावी.

२) कार्यालयाचे संकेतस्थळ आणि कार्यालयासाठी विकसीत केलेल्या संगणक प्रणालीतील धर्मादाय कार्यालयाच्या वतीने प्रस्तावासोबत सादर केलेल्या Problems/Bugs व तद्नुषंगीक डेव्हलपमेंट /सुधारणा, Change Request या साठी या PIC च्या मूळ प्रस्तावातील भाग -२ नुसार तात्पुरत्या स्वरूपात मे. मास्टेक कंपनीने सादर केलेल्या दरपत्रकाप्रमाणे Maintenance Contract ला (Part a) नुसार २५ Man Month पर्यंतच्या (रू.६२,१०,१००/-) खर्चास व त्या अनुषंगाने उल्लेखीत सेक्युरीटी ऑडीटच्या रू.३,००,०००/- पर्यंतच्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

३) मे. मास्टेक लि. यांचेसोबत पुढील दीर्घ कालावधी साठी करार करण्यास कंपनीने असहमती दर्शविल्याने, धर्मादाय कार्यालयाच्या संकेतस्थळ व संगणक कार्यप्रणालीच्या देखभाल-दुरूस्ती व सुधारणेसाठी मसुदा RFP तयार करण्याचे निर्देश देणेबाबत तसेच RFP व पुढील Bid Management प्रक्रीया पार पाडण्यासाठीConsultant नेमण्याविषयी भविष्यात प्रकल्प अंमलबजावणी समितीची ( PIC ) बैठक घेण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४) धर्मादाय कार्यालयाचे संकेतस्थळ आणि कार्यालयासाठी विकसीत केलेल्या संगणक प्रणालीतील सुधारणा झाल्यानंतर, करारातील तरतुदींप्रमाणे आणि मे.मास्टेक लि. यांचे संकेतस्थळ व संगणक कार्यप्रणालीचे तंत्रज्ञान हस्तांतरणासाठी आवश्यक ते सहकार्य मिळवून, धर्मादाय आयुक्त विभागाने दि. ९ऑगस्ट, २०१६च्या शासन निर्णयाप्रमाणे स्थापित झालेल्या MAHA-IT कंपनी कडे वार्षिक सेवा व देखभाल-दुरूस्ती करार करण्यासाठी पत्रव्यवहार करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८ च्या भाग पहीला, उपविभाग -दोन मधील अनु. क्र.२७-अ, नियम क्र.७६ नुसार प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११२६१५१६०१२९१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kamini R Pilankar

Digitally signed by Kamini R Pilankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bd66db73425a9730e4074ae475eb26788ae32a45d13639a02fcf2ffbd43272ff, serialNumber=791d70f75a8bfaa8349786f02d71cad4fb9d1999ea0d92d63dcf5de198d4f817, cn=Kamini R Pilankar
Date: 2019.11.26 15:22:06 +05'30'

**( का.रा.पिळणकर )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रति-**

१. प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान ), सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव व विधि परामर्शी , मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई किंवा त्यांचे प्रतिनिधी
५. धर्मादाय आयुक्त, धर्मादाय आयुक्त कार्यालय, डॉ.ॲनी बेझंट रोड, वरळी, मुंबई.
६. विधि सल्लागार-नि-सहसचिव(कार्या-१७), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
७. मे.मास्टेक लि. ( धर्मादाय आयुक्त कार्यालय, डॉ.ॲनी बेझंट रोड, वरळी, मुंबई यांचेमार्फत )
८. कार्यासन १७-संग्रहार्थ.